**समग्र शिक्षा या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणी व संनियंत्रणाबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र.समग्र-२०२०/प्र.क्र.१२०/एस.डी.-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २४ जुलै, २०२०

**वाचा:**
१) शासन निर्णय क्रमांक: पीआरई १०९३/६८०७/प्राशि-३, दिनांक ७ मे, १९९४
२) शासन निर्णय क्रमांक: पीआरई २०००/(२७४०) /प्राशि-१, दिनांक १८ जानेवारी, २००२
३) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९
४) शासन निर्णय क्रमांक: आरएमएसए २०१०/ (५०७/१०)/माशि-१, दिनांक ३० जून, २०१०
५) महाराष्ट्र बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार नियम, २०११
६) शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान विभाग क्रमांक : मातंस-२०११/प्र.क्र. १२५/३९, दिनांक २३ सप्टेंबर, २०११
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/०४/२०१५
८) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक : भांखस-२०१४/ प्र.क्र८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६
९) भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१८, दिनांक ०३ एप्रिल, २०१८, दिनांक ०५ एप्रिल, २०१८, दिनांक २५ एप्रिल, २०१८ चे पत्र.
१०) भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचेकडील दि.०६ ऑगस्ट, २०१८ चे वित्तीय व्यवस्थापन व खरेदीबाबत मार्गदर्शक तत्वे पुस्तिका.

**पार्श्वभूमी:**

राज्य शासनामार्फत शालेय शिक्षणासाठी दरवर्षी साधारणत: रू. ४०,००० कोटी अनिवार्य व रू.३५०० कोटी योजनेवरील खर्च करण्यात येतो. या पैकी समग्र शिक्षा ह्या केंद्र पुरस्कृत योजनेवर साधारणत: रू. १५०० कोटी इतका खर्च करण्यात येतो. समग्र शिक्षा योजना ही राज्य शासनाच्या नियमित योजनांना पुरक असून त्यात Gaps भरून काढण्यासाठी समग्र शिक्षाचा आराखडा तयार करण्यात येतो. समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीकरिता निधी वेळेवर उपलब्ध व्हावा यासाठी व नियमित शिक्षण यंत्रणेशी समन्वय साधण्यासाठी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई या संस्थेची स्थापना करण्यात आली आहे. सदर योजनेची अंमलबजावणी ही केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात येते. समग्र शिक्षा कार्यक्रमाचे वित्तीय नियोजन व कार्यक्रमासाठी आवश्यक खरेदी करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे केंद्र शासनाने दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८ रोजी FMP Manual

(Manual on Financial Management and Procuremtn) मध्ये विहित केली आहेत. एफएमपी म्यॅनुअल मधील तरतूदीनुसार समग्र शिक्षा या योजनेचे राज्य स्तरावर संनियंत्रण करण्याचे अधिकार राज्य शासनास आहेत. परंतु असे लक्षात आले आहे की, सदर योजनेचा वार्षिक आराखडा (AWP) (Annual Work Plan) तयार करतांना व सादर आराखड्यातील प्राधान्यक्रम ठरवितांना शासनाची मान्यता घेण्यात येत नाही. तसेच जो निधी राज्य शासनास केंद्र शासनाकडून प्रतिपूर्ती (Reimbursement) म्हणून मंजूर होतो त्याची प्रत्यक्ष प्रतिपूर्ती राज्य शासनास करण्यात येत नाही. सदर बाबीवर नियंत्रण आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

तसेच "शालेय पोषण आहार" योजना ही सुध्दा एक केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेवरील खर्च सुध्दा केंद्र व राज्य शासन ६०:४० या प्रमाणात करण्यात येतो. या योजनेतील ई-निविदा प्रसिध्द करण्यापूर्वी आवश्यक कागदपत्रांसह शासनाच्या मान्यतेसाठी पाठविण्यात येतात. तसेच ई-निविदा अंतिम झाल्यानंतरही L-१ ला शासनाची मान्यता घेण्यात येते.

तथापि, "समग्र शिक्षा" योजनेतील खरेदीच्या ई-निविदा प्रसिध्द करण्यापूर्वी आवश्यक कागदपत्रांना (निविदा मसुदा, तांत्रिक विनिर्दिशके) शासनाची मान्यता घेण्यात येत नाही. तसेच ई-निविदा अंतिम झाल्यानंतरही त्यास शासनाची मान्यता घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येत नाही. महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदे मार्फत विद्यार्थ्यांना संगणक, खेळाचे साहित्य, पुरक वाचन साहित्य, पुस्तके, ईत्यादि शैक्षणिक साहित्य पुरविण्यात येतात. तथापि,काही खरेदी प्रकरणामध्ये अनियमितता झाल्याच्या तक्रारी शासनास वेळोवेळी प्राप्त होतात.

त्यामुळे समग्र शिक्षा योजनेंतर्गत करण्यात येत असलेल्या खरेदी प्रकरणात पारदर्शकता आणणे व त्याचे योग्य प्रकारे संनियंत्रण करणे यासाठी शालेय पोषण आहार योजनतील कार्यपद्धती प्रमाणे समग्र शिक्षा योजनेच्या खरेदी प्रकरणी सुधारित निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत खालील प्रमाणे शासन निर्णय जारी करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी व सनियंत्रणासाठी शासन खालील प्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

**योजनेचे सनियंत्रण (Monitoring of the scheme) :**

**अ) कार्यक्रम व्यवस्थापन**

i) केंद्र शासनाच्या दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८ च्या Manual of Financial Management and Procurement (FMP) मधील प्रकरण-२ नुसार महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने दरवर्षी Annual Work Plan & Budget (AWP&B) तयार करून त्यास आधी राज्य शासनाची व नंतर कार्यकारी समितीची मान्यता घ्यावी.

ii) केंद्र शासनाकडून वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने शासनाकडे केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळण्यासाठी प्रस्ताव सादर करतांना प्रस्तावासोबत लगत पूर्वीच्या महिन्याअखेर प्राप्त निधी व घटकनिहाय खर्चाची माहिती विहित विवरणपत्रामध्ये सादर करावी.

iii) केंद्र शासनाच्या दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८ च्या Manual of Financial Management and Procurement (FMP) मार्गदर्शक पुस्तिकेतील प्रकरण-५ नुसार केंद्र शासनास तिमाही अहवाल सादर करावेत. त्याची प्रत शासनास पाठवावी.

iv) या योजने वरील ४० टक्के खर्च राज्य शासन मंजूर करते. त्यामूळे पदनिर्मितीचा आर्थिक बोजा राज्य शासनावर येतो. त्यामुळे जिल्हा व महानगरपालिका स्तरावर योजनांचे कार्यान्वयन / नियोजन आणि योजनांतर्गत प्रकल्प कालावधीकरिता आवश्यक नवीन कंत्राटी पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव कार्यकारी समितीला सादर करण्यापूर्वी पदनिर्मितीला राज्य शासनाची मान्यता घेण्यात यावी.

v) या योजनेमधील आरटीई २५ टक्के शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती वरील खर्च तसेच शिक्षकांच्या वेतनावरील खर्च आधी राज्य शासन स्वनिधीतून करते व त्याची प्रतिपूर्ती केंद्र शासन व राज्य शासनाकडून मिळणाऱ्या निधीतून होते. त्यामुळे केंद्र शासनाने निधी वितरित केल्यानंतर, वार्षिक कार्ययोजना व अर्थसंकल्पामध्ये (Annual Work Plan and Budget ) (AWP&B ) सदर बाबींसाठी मंजूर करण्यात आलेल्या रकमेची प्रतिपूर्ती, राज्य शासनाच्या एकत्रित निधीत शासन स्तरावरून आवश्यकतेप्रमाणे तीन हप्त्यामध्ये करण्यात येईल.

vi) कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीनंतर त्यांची वेतनवाढ करावयाची असल्यास सदर प्रस्तावास कार्यकारी समितीची मान्यता घेण्यापूर्वी विभागाची मान्यता अनिवार्य राहील.

vii) Manual of Financial Management and Procurement (FMP) मधील तरतूदीनुसार मागील वर्षाचा अखर्चित निधी चालू वर्षी खर्च करण्यासाठी राज्य शासनाची परवानगी घ्यावी.

**ब ) प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee )**

i) केंद्र शासनाच्या दिनांक ०६ ऑगस्ट, २०१८ च्या Manual of Financial Management and Procurement (FMP) मार्गदर्शक पुस्तिकेतील प्रकरण-७ मधील ७.८ मधील तरतूदीनुसार समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीची जबाबदारी राज्य शासनाची असल्यामुळे समग्र शिक्षा अंतर्गत खरेदी/सेवा पुरवठा करणे बाबत उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार ई-निविदा खरेदीची पध्दत अवलंबविण्यात यावी. कार्यकारी समितीपुढे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी ज्या बाबींची खरेदी करावयाची आहे तो प्रस्ताव महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने राज्य शासनास सादर करावा व सदर प्रस्तावासाठी आवश्यक असलेल्या तांत्रिक विनिर्दिशिकेस (SPECIFICATIONS), खरेदी प्रस्तावाची एकूण किंमत, खरेदी करावयाच्या एकूण संख्या, निविदेचा मसुद्या यांना शासनाची पूर्व मान्यता घ्यावी. शासनाच्या व कार्यकारी समितीच्या मान्यतेनंतर व ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात आल्यानंतर न्यूनतम निविदाधारकास (L१)कार्यारंभ आदेश देण्यास मंजूरी देण्याच्या प्रस्तावास शासनाची मान्यता घेण्यात यावी.

ii) सदर प्रकरणातील क्रमांक-७.७ येथील तरतूद “The State may, however follow the financial ceiling prescribed by each State for various methods of procurement” अशी आहे. त्यानुसार राज्य शासनाच्या वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग दोन, अ.क्र.२७ (अ) नियम ७६, अ.क्र.२९, नियम ७९ तसेच उपविभाग तीन अ.क्र.४,

नियम २७ (२) (अ) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकाराची मर्यादा विचारात घेऊन महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने खरेदीचे प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर करावेत.

२. राज्य प्रकल्प संचालकाना विभाग प्रमुख म्हणून वरील नियमाप्रमाणे जे खरेदी करण्याचे अधिकार आहेत त्या मर्यादेत त्यांच्या मान्यतेने त्यांच्या स्तरावर खरेदी करता येईल. मात्र वित्तीय मर्यादेच्या पेक्षा अधिक रकमेची खरेदी करावयाची असेल तेंव्हा तो प्रस्ताव कार्यकारी समितीपुढे ठेवण्यापूर्वी त्यास प्रशासकीय विभागाची / शासनाची मान्यता घ्यावी. रु.५ कोटी पेक्षा अधिक रकमेची खरेदी करावयाची असेल तर त्यास अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्या अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता घेण्यात यावी. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | आयुक्त (शिक्षण) पुणे | सदस्य |
| ४ | संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय मंत्रालय, मुंबई (आवश्यकते प्रमाणे) | सदस्य |
| ५ | उद्योग सहसंचालक (भांडार खरेदी)/ उद्योग संचालनालयाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | उप सचिव (विद्यार्थी विकास)/समग्र शिक्षा, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, मुंबई | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३६/२०२०/व्यय ५, दिनांक २१/०७/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७२४१६०४०१३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Vandana Rajesh Krishna

Digitally signed by Vandana Rajesh Krishna
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0fcc377904ac87f7a5e5158674b1d40a2020cdaa95aa18dd49ffef7a9322f98b, serialNumber=88bb796a63074ccd9f97ddb710a5683f6d7ff0d85030986af2ef21e85f72c879, cn=Vandana Rajesh Krishna
Date: 2020.07.24 16:59:09 +05'30'

**( वन्दना कृष्णा )**

**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव/सचिव, (उद्योग) उद्योग, उर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
१०.संचालक, माहिती व तंत्रज्ञान, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
११.संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई
१२.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
१३.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.उद्योग सहसंचालक (भांडार खरेदी) मुंबई
१६.निवड नस्ती / एसडी - १